**सन २०१७-१८ करीता इको टुरि झम (राज्य) योजनेंतर्गत पर्यटन स्थळांच्या विकास कामांकरिता निधी वितरण. (२४०६ २२९५)**
**नमामी चंद्रभागा अंर्तगत यशवंतराव चव्हाण यमाई तलाव परिसर पंढरपुर तुळशी वृंदावन उद्यान निर्मिती**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१७/ प्र.क्र.९२ /फ- ५**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :-०८ जून, २०१७.

<u>वाचा</u> :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्रं. कक्ष-१/ पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२८(१६-१७)/६९/१६-१७,दि. १३/४/२०१७.
२) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ ,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२/यो / तु.वृंदा/३४०/१६-१७ नागपूर दि.८/०२/२०१७
३) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ ,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२/यो / यमाई तलाव/८८/१७-१८ नागपूर दि.७/०६/२०१७

**<u>प्रस्तावना :-</u>**

पंढरपुर येथील विठ्ठल मंदिर हे अवघ्या माहाराष्ट्राचे स्फुर्तीस्थान असून या मंदिरामुळे हे ठिकाण वारकऱ्यांचे तिर्थक्षेत्र म्हणून प्रख्यात आहे. पंढरपुर येथे वर्षातुन चार एकादशींना (चैत्री,आषाढी,मागी व कार्तिकी) चार वेळा यात्रा भरतात. या यात्रांच्या सुमारास देशभरातुन लाखो भाविक येथे वारी करण्यासाठी व विठ्ठल- रूख्माईचे दर्शन घेण्यासाठी पायी चालत येतात.

पंढरीचा पांडूरंग हा कृष्णाचा अवतार समजला जातो, कृष्णाला अंत्यंत प्रिय असणारी वनस्पती म्हणजेच तुळस, या तुळशीला वारकरी सांप्रदायामध्ये खुपच महत्व आहे. तुळशीचे भक्तीभावाने जसे वर्णन सापडते, तसे तुळशीला विज्ञानाच्या कसोटीवर देखील अनन्य साधारण महत्व आहे. अनेक प्रकारचे त्वचा रोग, काही असाध्य रोग यांचेवर तुळस गुणकारी असल्याचे आयुर्वेद सांगतो, तर या तुळशीचे रोपटे प्रत्येक दिंडीमध्ये स्वताचे मस्तकावर घेवून नाचतांना वारकरी आपल्याला दिसतात. पर्यावरण व वनाविषयी जनजागृती होण्यासाठी पंढरपुर येथे तुळशी वृंदावन उद्यान उभारण्याचे प्रस्तावित आहे. सदरहू पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी सन २०१७-१८ करीता निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

त्यास अनुसरून, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांनी संदर्भाधीन दि. १३.०४.२०१७ च्या पत्रान्वये निसर्ग पर्यटन /वन पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या योजनेंतर्गत सन २०१७-१८ साठी नमामी चंद्रभागा अंर्तगत यशवंतराव चव्हाण यमाई तलाव परिसर पंढरपुर तुळशी वृंदावन उद्यान निर्मितीकरिता रुपये ३२९ लक्ष (तीनशे एकोणतीस लक्ष फक्त) निधी मंजूर करण्याची विशेष बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

निसर्ग पर्यटन / वन पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) (संरक्षित क्षेत्राबाहेर) या योजनेतंर्गत विकसित करण्यात येणार पर्यटन स्थळे ही वनक्षेत्रावर विकसित करण्यात येतात. पंढरपुर येथे शहरामध्ये वन विभागाच्या मालकीची जागा नाही तथापि पंढरपूर येथे येणारे भाविक/ पर्यटक यांची संख्या विचारात घेऊन तुळशी वृंदावन उद्यान उभारण्यासाठी नगरपालिका, पंढरपुर यांनी जागा उपलब्ध करून दिली असून सदरहू ठिकाणी विकासात्मक कामे करण्यास मान्यता दिली आहे. नगरपालिका, पंढरपुर यांच्या मालकीच्या जागेवर विशेष बाब म्हणुन तुळशी वृंदावन उद्यान उभारण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

पुणे वनवृत्तातील नमामी चंद्रभागा अंर्तगत यशवंतराव चव्हाण यमाई तलाव परिसर पंढरपुर तुळशी वृंदावन उद्यान याचा पर्यटन स्थळ म्हणून विकास करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, निसर्ग पर्यटन मंडळ नागपूर व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी केलेली शिफारस विचारात घेवून खाली नमुद केलेली कामे करण्यासाठी एकुण रूपये ३२९.०० लक्ष (रुपये तीनशे एकोणतीस लक्ष फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

(रक्कम लाखात)

| अ.क्र. | विकास कामाचा तपशिल | परिमाण | एकुण खर्च |
|---|---|---|---|
| १ | यमाई तलावामध्ये रिटेंलिंन वॉल बांधणे | १९०. ००R.mt. | १९८.३५ |
| २ | उद्यानासाठी प्रवेश द्वारासह संरक्षक भिंत बांधणे | २६६. ००R.mt. | २०.२९ |
| ३ | तुळशी वृंदावनमध्ये पादचारी मार्ग बांधणे | ११००. ००R.mt. | ८९.८२ |
| ४ | उद्यानातील प्रस्तावित रिटेनिंग वॉलजवळ भराव करणे | १९०. ००R.mt. | १५.४४ |
| ५ | तुळशी लागवडीसाठी पोयटा माती भरणे | ब्रास १२५० | २.१० |
| ६ | तुळशी उद्यान व चंद्रभागाचे प्रस्तावित चलचित्र तयार करणे, नकाशे तयार करणे, पोष्टर तयार करणे इ. | -- | ३.०० |
| **७** | **एकुण** | **--** | **३२९.००** |

२. सदरहू पर्यटन स्थळाचा विकास करण्यासाठी एकूण ३२९.०० लक्ष (रुपये तीनशे एकोणतीस लक्ष फक्त) खालील प्रमाणे उद्दिष्ट निहाय खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपये लाखात)

| अ.क्र. | पर्यटन स्थळाचे नाव | ०२ मजुरी | २१ पुरवठा व सामग्री | ५० इतर खर्च | एकुण |
|---|---|---|---|---|---|
| १ | नमामी चंद्रभागा अंर्तगत यशवंतराव चव्हाण यमाई तलाव परिसर पंढरपुर तुळशी वृंदावन उद्यान निर्मिती | रू.१६४.५० | रू.८२.२५ | रू.८२.२५ | रू.३२९.०० |

सदरहू शासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१. उपरोक्त खर्च विहीत कार्यपद्धतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात पूर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगीता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

२. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र. भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III दिनांक १ डिसेंबर, २०१६ अनुसार नियम पुस्तिकेच्या परिच्छेद ४.१ मध्ये नमुद केल्यानुसार निविदा प्रक्रियेत खरेदी किंमत रुपये तीन लाख व त्यापेक्षा अधिक असल्यास ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

३. प्रस्तावात अंतर्भूत असलेले क्षेत्र हे नगरपालिका पंढरपूर यांचे मालकीचे असल्याने, त्यांची रितसर परवानगी/मंजूरी घेवूनच कामे करावीत. त्याचप्रमाणे सदरहू कामे महाराष्ट्र राज्याच्या निसर्ग पर्यटन धोरणानुसार असतील याची खात्री करण्यात यावी.

४. सदरहू पर्यटन स्थळाच्या ठिकाणी करण्यात येणाऱ्या सर्व विकासात्मक कामास महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळाच्या कार्यकारी समितीची मान्यता घेण्यात यावी.

५. प्रस्तावित सर्व कामांना सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी आहे याची खात्री करुनच कामे करावीत. तसेच सदरहू कामे करतांना प्रचलित कायदे नियम या तरतूदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय / केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना / आदेशांची अवहेलना होणार नाही याची दक्षता घ्यावी.

६. शासन निर्णयात नमुद कामासाठी इतर स्त्रोतातुन निधी घेण्यात येणार नाही व कामाची द्विरुक्ती होणार नाही याचे प्रमाणपत्र उपयोगिता प्रमाणपत्रासोबत द्यावे त्याशिवाय पुढील निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घ्यावी.

७. सदर प्रस्तावातंर्गत करावयाचा खर्च एकुण रू. ३२९.०० लक्ष (रुपये तीनशे एकोणतीस लक्ष फक्त) हा सन २०१७-१८ साठी मागणी क्र. सी-०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७ /प्र.क्र.७५/अर्थ-३ दि.१८ एप्रिल, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०८१४०५२७८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2017.06.08 14:04:18 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

(१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) , महाराष्ट्र राज्य, नागपूर
(२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , महाराष्ट्र राज्य, नागपूर
(३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर
(४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर.
(५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे वनवृत्त, पुणे.
(६) उप वनसंरक्षक, सोलापूर वन विभाग, सोलापूर.
(७) जिल्हाधिकारी, सोलापूर.
(८) मुख्याधिकारी, पंढरपूर नगरपालिका, पंढरपूर
(९) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
(१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
(११) कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम)/, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१२) ब-१/फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग ,मंत्रालय, मुंबई.
(१३) निवड नस्ती, फ-५.